**महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाकडील नोदींत पात्र बांधकाम कामगारांना बांधकामासाठी उपयुक्त/आवश्यक असलेली अवजारे खरेदी करण्याकरीता मंडळाकडून रु. ५०००/- चे अर्थसहाय्य देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

### उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : इबांका-२०१५/९२०/प्र.क्र.३१८/काम-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०१ मार्च, २०१७.

**वाचा-** (१) शासन पत्र समक्रमांक दिनांक ५.४.२०१६ व दिनांक १.८.२०१६.
(२) महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाचे पत्र क्र. मइवइबांकाकमं/२०१६, दिनांक १७.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाकडील नोंदीत पात्र बांधकाम कामगारांच्या प्रती कुटुंबास बांधकामासाठी उपयुक्त/आवश्यक असलेली अवजारे खरेदी करण्याकरीता मंडळाकडून दर तीन वर्षातून एकदा रु. ५०००/- इतके अर्थसहाय्य देण्याबाबतच्या मंडळाच्या प्रस्तावास दिनांक ०५/०४/२०१६ रोजीच्या शासन पत्रान्वये काही अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि, पात्र बांधकाम कामगारांना सदर योजनेचा लाभ नोंदणी झाल्याबरोबर द्यावा अथवा नोंदणी झाल्यानंतर तीन वर्षानी द्यावा, याबाबत संभ्रम निर्माण झाला होता. तसेच शासनाने दिनांक ०५/०४/२०१६ रोजीच्या पत्रान्वये दिलेली मान्यता ही केंद्र शासनाच्या सुचनांशी सुसंगत आहे किंवा कसे, याबाबतही स्पष्टता नसल्यामुळे एकूणच सदर योजनेची अंमलबजावणी प्रलंबित राहिली आहे. केंद्र शासनाच्या श्रम व रोजगार मंत्रालयाने दि. ११/०१/२०१७ रोजीच्या पत्रान्वये, प्रकरणी राज्य शासन निर्णय घेण्यास सक्षम असल्याचे कळविले आहे. या पार्श्वभूमीवर शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाकडील नोंदीत पात्र बांधकाम कामगारांच्या प्रती कुटुंबास बांधकामासाठी उपयुक्त/आवश्यक असलेली अवजारे खरेदी करण्याकरीता रु. ५०००/- चे अर्थसहाय्य हे बांधकाम कामगारांच्या नोंदणी नंतर लगेच देण्यात यावे. तसेच पुढील तीन वर्षानंतर लाभ घेण्यासाठी अशा बांधकाम कामगारांची मंडळाकडे सलग तीन वर्षे नोंदणी असणे अनिवार्य आहे.

लाभ वितरणापूर्वी पात्र बांधकाम कामगारांकडून मंडळाने आवश्यक असा विहित नमुन्यातील अर्ज भरुन घेणे आवश्यक आहे. सदर योजनेंतर्गत देण्यात येणारे अर्थसहाय्य केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार (DBT) लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावे. तसेच सदर योजनेच्या अंमलबजावणीबाबतचा वार्षिक अहवाल मंडळाने शासनास नियमितपणे सादर करावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्यांचा संगणक संकेतांक २०१७०३०११९०५०४२४०१० असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pursing Rathod

Digitally signed by Prashant Pursing Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=I.E. And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=52765f3be2e2200a1f6f448ce52356167e452ddd0e9b494a8409e6be0d39bd0d, cn=Prashant Pursing Rathod
Date: 2017.03.01 12:48:08 +05'30'

( प्रशांत पु. राठोड )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक.
५. समितीचे इतर सर्व सदस्य (व्दारा कामगार आयुक्त)
६. कामगार आयुक्त, मुंबई / अतिरिक्त कामगार आयुक्त, मुंबई/पुणे/नागपूर.
७. उप कामगार आयुक्त, मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद.
८. सचिव, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई
९. महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
१०.महालेखापाल-२ महाराष्ट्र (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), नागपूर.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२.निवडनस्ती (कामगार-७).